**अर्थसंकल्पीय अनुदान. वर्ष २००९-२०१०.**
**महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी (विशेष घटक योजना) अनुदान देणे.**
**मागणी क्रमांक वाय-२, २२१५, (२२१५ २०६२) (वेतनेतर)**

---

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक नादव-२००९/पापुयो/अनुदान/प्र.क्र.१३/पापु-२४**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : २० मार्च, २०१०.**

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांक नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२, दिनांक २५ ऑगस्ट, २००६
२) शासन निर्णय क्रमांक नादव-२००९/प्र.क्र.१६१/पापु-२२, दिनांक ०३ ऑगस्ट, २००९
३) शासन निर्णय क्रमांक नादव-२००९/पापुयो/अनुदान/प्र.क्र.१३/पापु-२४, दिनांक ०७ नोव्हेंबर, २००९
४) शासन निर्णय क्रमांक नादव-२००९/प्र.क्र.३४३/पापु-२२, दिनांक २९ डिसेंबर, २००९.
५) अवर सचिव, पापु-२२ यांचे पत्र क्रमांक नादव-२०१०/प्र.क्र.११७/पापु-२२, दिनांक ०९ मार्च, २०१०.

**प्रस्तावना -**

वर्ष २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक वाय-२, २२१५ महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना), (२२१५ २०६२) (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली रुपये १०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतके अर्थसंकल्पीय अनुदान मंजूर करण्यात आले होते. मात्र सुधारीत अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये रुपये ०८,००,००,०००/- (रुपये आठ कोटी फक्त) इतकी सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे.

२. या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून दिनांक ०७ नोव्हेंबर, २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये **जिल्हाधिकारी सिंधुदूर्ग, जळगांव, परभणी, हिंगोली, उस्मानाबाद, लातूर, यवतमाळ, नागपूर व चंद्रपूर** यांना एकूण रुपये ०४,००,००,०००/- (रुपये चार कोटी फक्त) इतके अनुदान मुक्त करण्यात आले आहे.

३. आता माहे मार्च, २०१० या महिन्याकरीता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

(कृपया मागे पहावे.)

**<u>शासन निर्णय :-</u>**

नागरी पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत, नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना, या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरिता जिल्हाधिकारी यांच्याकडे नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनेच्या जिल्हा स्तरावरील संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यात आली आहे. जिल्हाधिकारी यांना या कार्यक्रमाच्या अनुषंगाने आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. हया कार्यक्रमाकरिता शासनाकडून जिल्हाधिकारी नाशिक, धुळे, सोलापूर, सांगली, नागपूर, बीड व परभणी यांना **या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून <u>विवरणपत्र-अ</u> मध्ये दर्शविल्यानुसार रुपये ०२,००,००,०००/- (रुपये दोन कोटी फक्त) अनुदान मुक्त करण्यात येत आहे.**

(१.१) जिल्हाधिकारी नाशिक, धुळे, सोलापूर, सांगली, नागपूर, बीड व परभणी यांनी सदर मुक्त अनुदान सोबत जोडलेल्या **<u>विवरणपत्र-अ</u>** मध्ये नमूद केलेल्या नागरी स्वराज्य संस्थांना पुनर्वाटपाव्दारे वाटप करण्यात यावे व तसे शासनास कळवावे.

(१.२) हया योजनेअंतर्गत मंजूर व मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

(१.३) संबंधित महानगरपालिका आणि नगरपालिका यांनी उपरोक्त मंजूर व मुक्त रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आलेली आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०१० पर्यंत खर्च करावी.

(१.४) जिल्हाधिकारी यांनी या योजनेंतर्गत आपल्या जिल्हयातील संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत निधीचा वर्षनिहाय तपशील,प्राप्त निधीतून हाती घेतलेली कामे,त्यापैकी पूर्ण कामे,अपूर्ण कामे, खर्च झालेली रक्कम व अखर्चित रक्कम इ. बाबतचा अभिलेख ठेवावा व ही माहिती शासनास आवश्यकतेनुसार तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

(१.५) हया योजनेअंतर्गत मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानातून संबंधित महानगरपालिका आणि नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी, हया योजनांकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई /नागपूर यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत. याबाबत संबंधित कागदपत्रे महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास संबंधित महानगरपालिका व नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी, त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.

(१.६) मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता संबंधित महानगरपालिका आणि नगरपालिका अ,ब व क आणि जिल्हाधिकारी यांनी महालेखापाल यांना सादर करावेत.

(१.७) हया योजनेअंतर्गत शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत त्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र (<u>COMPLETION CERTIFICATE</u>), संबंधित महानगरपालिका व मुख्य अधिकारी नगरपालिका अ,ब व क आणि जिल्हाधिकारी यांनी शासनास द्यावयाची आहेत. आयुक्त महानगरपालिका आणि मुख्य अधिकारी नगरपालिका यांनी उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे

प्रमाणपत्र यांमध्ये दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत करावयात. उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र यांवर जिल्हाधिकारी यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी प्रमाणपत्रे शासनास स्विकारार्ह होतील. त्याचप्रमाणे काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र महालेखापाल यांनाही पाठवावे.

(३.८) हया योजनेअंतर्गत हाती घेतलेल्या कामाची भविष्यकाळातील देखभाल व दुरुस्तीवरील १०० टक्के खर्च संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या स्वनिधीतून करावयाचा आहे. हया योजनेच्या देखभाल व दुरुस्तीकरिता शासनाकडून कोणत्याही स्वरुपात अनुदान उपलब्ध करण्यात येणार नाही.

(३.९) मंजूर व मुक्त अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

२. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांबाबत क्रमांक नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२ दिनांक २५ ऑगस्ट,२००६ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करण्यात यावी.

३. उपरोक्त मंजूर व मुक्त करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ - पाणी पुरवठा, १९१ - स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य- राज्य योजना- (०२) (१०) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना) (२२१५ २० ६२) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७९१०/अर्थसंकल्प-१८, दिनांक १७ मार्च, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००३२०१९५६५१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी. जी. ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०००२०.

२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४०००१.

३) जिल्हाधिकारी नाशिक, धुळे, सोलापूर, सांगली, नागपूर, बीड व परभणी.

४) आयुक्त, नागपूर, महानगरपालिका, नागपूर.

(कृपया मागे पहावे.)

५) संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, शासकीय परिवहन सेवा इमारत, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई-४०० ०२५.
६) संचालक, समाजकल्याण, ३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग, पूणे- ४११००१.
७) सह संचालक, समाजकल्याण, ३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग, पूणे- ४११००१.
८) सह संचालक, अनुसूचित जाती उपयोजना (सांख्यिकी),समाजकल्याण, ३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग, पूणे- ४११००१.
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्स्प्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
११) निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय इमारत, सातवा मजला, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व) मुंबई -४०००५१.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, धुळे, सोलापूर, सांगली, नागपूर, बीड व परभणी.
१३) जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपालिका प्रशासन, जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे, सोलापूर, सांगली, नागपूर, बीड व परभणी.
१४) मुख्य अधिकारी, नगर परिषद, सिन्नर, जिल्हा नाशिक.
१५) मुख्य अधिकारी, नगर परिषद, शिरपूर वरवाडे/दोंडाईचा वरवाडे, जिल्हा धुळे.
१६) मुख्य अधिकारी, नगर परिषद, बार्शी/करमाळा, जिल्हा सोलापूर.
१७) मुख्य अधिकारी, नगर परिषद, सांगली मिरज कुपवाड, जिल्हा सांगली.
१८) मुख्य अधिकारी, नगर परिषद, माजलगांव/परळी वैजनाथ/अंबाजोगाई/बीड/गेवराई/किल्लेधारुर, जिल्हा बीड.
१९) मुख्य अधिकारी, नगर परिषद, सोनपेठ/सेलू/पाथरी/जिंतूर/परभणी/गंगाखेड, जिल्हा परभणी.
२०) कार्यासन क्रमांक विघयो-१, सामाजिक न्याय विभाग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२१) कार्यासन क्रमांक १४७३, १४५१ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
२२) कार्यासन क्रमांक व्यय- ३, अर्थसंकल्प- १८, अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
२३) कार्यासन क्रमांक पापु- ०४,२०,२२ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई -४०००३२.
२४) संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
२५) निवडनस्ती पापु- २४

**--------------------------------------**********--------------------------------------**

---

शासन निर्णय क्रमांक नादव-२००९/पापुयो/अनुदान/प्र.क्र.१३/पापु-२४ दिनांक २० मार्च, २०१० रोजीचे सहपत्र

**नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनें अंतर्गत जिल्हाधिकारी/महानगरपालिका/नगरपालिका यांना मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हानिहाय/महानगरपालिकानिहाय/नगरपालिकानिहाय विवरण.**

विवरणपत्र-अ

(रुपये)

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | नागरी स्थानिक संस्थेचे नांव | महानगरपालिका | नगरपालिका | वर्ग | मंजूर व मुक्त अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| १ | नाशिक | सिन्नर | - | नगर पालिका | क | १०,००,००० |
| | **एकूण : ०१ न.पा.** | | | | | **१०,००,०००** |
| | | | | | | |
| २ | धुळे | शिरपूर वरवाडे | - | नगर पालिका | ब | १०,७२,३३७ |
| | | दोंडाईचा वरवाडे | - | नगर पालिका | ब | १२,००,००० |
| | **एकूण : ०२ न.पा.** | | | | | **२२,७२,३३७** |
| | | | | | | |
| ३ | सोलापूर | बार्शी | - | नगर पालिका | अ | १५,००,००० |
| | | करमाळा | - | नगरपालिका | क | १०,००,००० |
| | **एकूण : ०२ न.पा.** | | | | | **२५,००,०००** |
| | | | | | | |
| ४ | सांगली | वीटा | - | नगर पालिका | ब | १२,००,००० |
| | **एकूण : ०१ न.पा.** | | | | | **१२,००,०००** |
| | | | | | | |
| ५ | नागपूर | नागपूर | महानगरपालिका | - | - | ०२,४६,८५१ |
| | **एकूण : ०१ म.न.पा.** | | | | | **०२,४६,८५१** |
| | | | | | | |
| ६ | बीड | बीड | - | नगर पालिका | अ | १४,५६,८९० |
| | | माजलगांव | - | नगर पालिका | ब | १०,८०,००० |
| | | परळी वैजनाथ | - | नगर पालिका | ब | ११,३१,७५० |
| | | अंबाजोगाई | - | नगर पालिका | ब | १२,००,००० |
| | | गेवराई | - | नगर पालिका | क | ०९,८१,९९० |
| | | किल्लेधारुर | - | नगर पालिका | क | ०५,५९,४३१ |
| | **एकूण : ०६ न.पा.** | | | | | **६४,१०,०६१** |

**(कृपया मागे पहावे.)**

(रुपये)

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | नागरी स्थानिक संस्थेचे नांव | महानगरपालिका | नगरपालिका | वर्ग | मंजूर व मुक्त अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| ७ | परभणी | परभणी | - | नगर पालिका | अ | १४,८१,००० |
| | | गंगाखेड | - | नगर पालिका | ब | १२,००,००० |
| | | सोनपेठ | - | नगर पालिका | क | ०८,९९,३७० |
| | | सेलू | - | नगर पालिका | क | ०९,९८,५८२ |
| | | पाथरी | - | नगर पालिका | क | ०९,००,००० |
| | | जिंतूर | - | नगर पालिका | क | ०८,९१,७९९ |
| | एकूण : ०६ न.पा. | | | | | ६३,७०,७५१ |
| | | | | | | |
| | एकूण : ०१ म.न.पा. व १८ न.पा. = १९ | | | | | ०२,००,००,००० |

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

-----------------------------**************-----------------------------------------------------

---------------------------------------------------------------------------------------------------------------